**निवडसूची सन-२०२०-२०२१**
**उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ संवर्गामध्ये पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्था-२०२०/प्र.क्र.६९/ई-६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक : १८ ऑक्टोबर, २०२१

**संदर्भ:** १) महाराष्ट्र शासकीय गट - अ व गट - ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसुली विभाग वाटप नियम, २०२१, दिनांक १४ जुलै, २०२१
२) शासन आदेश, समक्रमांक, दि. ०६ सप्टेंबर, २०२१

**प्रस्तावना:-**

भूमि अभिलेख विभागातील जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामधून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासंदर्भात पात्र ठरलेल्या ५ अधिकाऱ्यांपैकी, ३ अधिकाऱ्यांचे पदोन्नतीने पदस्थापनेचे आदेश संदर्भाधीन क्र. २ च्या आदेशान्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर निवडसूचीतून पात्र ठरवण्यात आलेल्या उर्वरित अधिकाऱ्यांपैकी श्री. महंमद शरीफ बाबासाहेब पाटील यांना पदोन्नती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे आदेश देत आहे :-

**शासन आदेश :-**

भूमि अभिलेख विभागातील जिल्हा अधीक्षक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामधून उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या संवर्गामध्ये पदोन्नती देण्यासाठी सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतुदी विचारात घेऊन सेवाज्येष्ठतेनुसार पात्र ठरलेल्या खालील अधिकाऱ्यास उप संचालक भूमि अभिलेख, (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२३ रु.६७,७००-२,०८,७००) या संवर्गामध्ये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येवून खालीलप्रमाणे पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.. क्र | अधिकाऱ्याचे नाव | ज्येष्ठता क्रमांक<br>जात प्रवर्ग | सध्याचे कार्यरत ठिकाण | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. महंमद शरीफ बाबासाहेब पाटील | १७<br>खुला | प्रतिनियुक्ती विशेष कार्य अधिकारी, मा.मंत्री, ग्राम विकास व कामगार यांचे कार्यालय | प्रपत्र बढती.<br>मा.मंत्री, ग्राम विकास व कामगार यांच्या कार्यालयात विशेष कार्य अधिकारी या पदावर |

२. वर नमूद अधिकाऱ्यास खालील नमूद अटी / शर्तीच्या अधीन राहून पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे.

**अ)** मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री.विजय घोगरे व इतर संलग्न न्यायालयीन प्रकरणांत दिनांक ०४.०८.२०१७ रोजी निर्णय दिलेला असून याविरुध्द शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ च्या अधीन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ च्या स्थित सेवाजेष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सुचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर सहमती देण्यात येत आहे.

**आ)** श्री.महंमद शरीफ बाबासाहेब पाटील यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांचे काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियम ४०, परिशिष्ट-२ अट क्र. १८ अनुसार सध्याच्या प्रतिनियुक्तीच्या पदावर प्रपत्र पदोन्नती देण्यात आली असून त्यांचा सदर पदावरील कालावधी सहा महिन्यासांठी असेल.

**इ)** सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

**ई)** या पदावर देण्यात आलेली पदोन्नती (निवडसूची) महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतरच सदर पदावर सेवा ज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पदोन्नत अधिकारी पात्र ठरेल.

**उ)** त्यांना देण्यात आलेली ही पदोन्नती कोणतीही पूर्व सुचना वा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवीत आहे.

**ऊ)** पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यानी उप संचालक भूमि अभिलेख, गट-अ या पदावर कार्यभार ग्रहण केल्यानंतर त्या अधिकाऱ्याची शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमानुसार वेतननिश्चिती करण्यात यावी.

३. जिल्हा अधिक्षक भूमि अभिलेख (गट-अ) या संवर्गातून उप संचालक भूमि अभिलेख या संवर्गात पदोन्नत झालेल्या उपरोक्त अधिकाऱ्यानी पदस्थापनेनुसार पदावर रुजू होऊन कार्यभार स्वीकारल्यानंतरच त्यांना उप संचालक भूमि अभिलेख (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२३ - ६७७००-२०८७००) या संवर्गाच्या वेतनाचे लाभ अनुज्ञेय होतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११०१८१४३३५२५२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY
BANKAR

Digitally signed by SANJAY BANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c8a7d6860ff227fd9e69a02e9ca5dfb2ccb25eda92d749629970f349fc6ed260, pseudonym=B37546F6A6BD466ED45270ED708F924F51A07EA8, serialNumber=C5917E56B0DA516AB259D846D516CB0584DCE5E9A2E73C0A35FA47BAB64E88AA, cn=SANJAY BANKAR
Date: 2021.10.21 13:08:41 +05'30'

**(संजय बनकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:**

१) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
२) उप संचालक भूमि अभिलेख, संलग्न जमाबंदी आयुक्त कार्यालय, पुणे (सर्वसाधारण/ भूमापन/एकत्रिकरण/नागरी भूमापन) (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे
३) उपसंचालक भूमि अभिलेख, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर प्रदेश, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर(द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे

**प्रत,**

१) प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (कार्या. २१), मंत्रालय, मुंबई-३२.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
३) श्री. महंमद शरीफ बाबासाहेब पाटील, विशेष कार्य अधिकारी, मा. मंत्री, ग्राम विकास व कामगार यांचे कार्यालय (द्वारा जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख (म.रा.), पुणे.
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२.
६) कार्यासन अधिकारी, कार्यासन-१२ व कार्यासन-२१, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) कार्यासन ई-६ संग्रहार्थ.